**मा. उच्च न्यायालय यांनी याचिका क्र. ७२०८/२०१५ संदर्भात दिलेल्या आदेशांची अंमलबजावणी करण्याबात स्थापन केलेल्या समितीबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यावरण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : याचिका-२०१३/प्र.क्र.१६२/तां.क.१**
१५ वा मजला, नवीन प्रशासकीय भवन, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई.
**दिनांक :- १५/०९/२०१५**

**वाचा** :-१) मा.उच्च न्यायालयाच्या मुंबई खंडपीठामध्ये दाखल करण्यात आलेल्या याचिका क्र.(१)७२०८/२०१५, (२)७४५६/२०१५, (३)७५७७/२०१५(४) ७७२०/२०१५ (५) ७७२४/२०१५,(६) ८१५८/२०१५मधील दिनांक १३/०८/२०१५ चे आदेश.

**प्रस्तावना** :-

मा.राष्ट्रीय हरीत लवाद (NGT) पुणे यांनी दिलेल्या आदेशास स्थगिती मिळविण्याकरीता १) डोंबिवली बेटर एनवायर्नमेंट व इतर वि. वनशक्ती पब्लिक ट्रस्ट (याचिका क्र. ७२०८/२०१५)२) उल्हासनगर महानगरपालिका वि. महाराष्ट्र शासन व इतर (याचिका क्र. ७४५६/२०१५)३) अंबरनाथ नगरपरिषद वि. महाराष्ट्र शासन, (याचिका क्र. ७५७७/२०१५)४) कुळगांव- बदलापूर नगरपालिका वि. महाराष्ट्र शासन,(याचिका क्र. ७७२०/२०१५)५) कल्याण डोबिंवली महानगरपालिका वि. वनशक्ती पब्लिक ट्रस्ट, (याचिका क्र. ७७४२/२०१५) ६) महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ (MIDC) वि. वनशक्ती पब्लिक ट्रस्ट (याचिका क्र. ८१५८/२०१५) यांनी मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे वरीलप्रमाणे याचिका दाखल करण्यात आल्या आहेत. मा.उच्च न्यायालयाने उपरोक्त याचिका मधील दि.१३/०८/२०१५ च्या आदेशान्वये मा. मुख्य सचिव महाराष्ट्र शासन यांच्या अध्यक्षतेखाली समिती स्थापन करण्याबाबत निर्देश दिले आहेत. या अनुषंगाने समिती स्थापन करणे शासनाच्या विचाराधीन होते.

**शासन निर्णय** :-

वरील प्रकरणी न्यायालयीन आदेशांची कडक अंमलबजावणी करण्यासाठी मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली खालीलप्रमाणे समिती स्थापन करण्यात येत आहे.

| | |
|---|---|
| १) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन | अध्यक्ष |
| २) प्रधान सचिव, पर्यावरण विभाग | सदस्य |
| ३) प्रधान सचिव, उद्योग विभाग | सदस्य |
| ४) प्रधान सचिव, नगर विकास विभाग | सदस्य |
| ५) विभागीय आयुक्त, कोकण विभाग | सदस्य |
| ६) मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ | सदस्य |
| ७) आयुक्त, कल्याण-डोबिंवली महानगरपालिका | सदस्य |
| ८) आयुक्त, उल्हासनगर महानगरपालिका | सदस्य |
| ९) मुख्याधिकारी, कुळगांव-बदलापूर नगरपालिका | सदस्य |
| १०) मुख्याधिकारी, अबंरनाथ नगरपरिषद | सदस्य |

| | |
|---|---|
| ११) श्री राकेश कुमार , निरी, मुंबई | तज्ञ सदस्य |
| १२) श्री विरेंद्र सेठी, आय.आय.टी, पवई, मुंबई | तज्ञ सदस्य |
| १३) सदस्य सचिव, महाराष्ट्र प्रदुषण नियंत्रण मंडळ | सदस्य सचिव |

२. मा. मुख्य सचिव तथा समितीचे अध्यक्ष हे आवश्यकतेनुसार समितीच्या बैठकीस संबंधित अधिकारी तसेच संबंधित क्षेत्रातील तज्ञ व्यक्तींना आंमत्रित करु शकतील.

३. **समितीचे कार्य**- ही समिती मा. उच्च न्यायालयाच्या याचिका क्र.७२०८/२०१५ च्या संदर्भात दि.१३/८/२०१५ रोजीच्या आदेशातील परिच्छेद क्र. ३ व ४ जे पुढील प्रमाणे आहेत:-

"The committee shall consider the impugned order of NGT and submit an action plan for prevention and control of pollution, both industrial pollution and domestic pollution, and satisfactory remedial measures to be undertaken including providing for financial support to the local bodies i.e. the Municipal Corporations, Municipal Councils, MIDC and MPCB. The report shall be submitted within two months.

The Committee set up under this order headed by the Chief Secretary shall look into such issues and indicate within how much time the concerned Municipal Corporation/Municipal Council shall be provided with the necessary funds."

उपरोक्त मा.उच्च न्यायालय, मुंबई यांच्या आदेशांची अमंलबजावणी करण्याच्या दृष्टीने समिती सर्व संबंधितांना आवश्यक ते मार्गदर्शन करेल व आदेशांची अंमलबजावणी झाल्याची खातरजमा करेल व त्यानंतर सदस्य सचिव, महाराष्ट्र प्रदुषण नियंत्रण मंडळ हे दि.१२/१०/२०१५ पर्यंत मा. उच्च न्यायालयास केलेल्या कार्यवाहीचा एकत्रीत अहवाल सादर करतील .

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संकेतांक २०१५०९२४१६१९४८५७०४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Somnath Namdeo Bagul

Digitally signed by Somnath Namdeo Bagul
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=b01714c1480a47cec5943a1c3c73ea95af0534418cf92d1ac844331c4116879d, cn=Somnath Namdeo Bagul
Date: 2015.09.24 16:24:05 +05'30'

**(सो.ना. बागुल)**
उप सचिव

**प्रत माहितीसाठी :-**

१) मा.मुख्यमुत्रयांचे प्रधान सचिव

२) मा.मुख्य सचिव

३) प्रधान सचिव,उद्योग

४) प्रधान सचिव,नगर विकास विभाग,१/२

५) विभागीय आयुक्त,कोकण विभाग

६) मुख्य कार्यकारी अधिकारी,महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ,

७) सदस्य सचिव, महाराष्ट्र प्रदुषण नियंत्रण मंडळ,

८) आयुक्त, डोबिंवली - कल्याण, महानगरपालिका

९) आयुक्त,उल्हासनगर महानगरपालिका,

१०) मुख्यधिकारी,कुळगाव बदलापूर नगरपालिका जि.ठाणे

११) मुख्यधिकारी, अबंरनाथ नगरपरिषद,

१२) मा.मंत्री (पर्यावरण) यांचे खाजगी सचिव

१३) मा.राज्यमंत्री (पर्यावरण) यांचे खाजगी सचिव

१४) सर्व अधिकारी/कार्यासने/निवडनस्ती-तां.क १, पर्यावरण विभाग, मंत्रालय.